**मौजे शिलापूर ता.जि.नाशिक येथील गट नंबर २२० मधील ४० हे.आर जमीन "केंद्रीय विद्युत अनुसंधान संस्थान" यांना पश्चिम विभागीय केन्द्रीय इलेक्ट्रिकल टेस्टींग लॅब स्थापन करण्यासाठी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः जमीन-३०१४/प्र.क्र.१८७/ज-६**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, १ ला मजला

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: ०६ ऑक्टोंबर, २०१५

**संदर्भ :**

विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र.मशा/कार्या-२/जमीन-२/१५१७९/२०१५ जा.क्र.८८१९, दिनांक १८/४/२०१५ व दिनांक ६/८/२०१५

**प्रस्तावना :**

देशातील ऊर्जा क्षेत्रात संशोधन व परीक्षण केंद्रीभूत पद्धतीने उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने भारत सरकारच्या विद्युत मंत्रालयांतर्गत केंद्रीय विद्युत अनुसंधान संस्थेची [Central Power Research Institute (CPRI)] स्थापना १९६० साली करण्यात आली आहे. सदर संस्थेचे पुनर्गठण १९७८ मध्ये करण्यात आले असून त्याद्वारे या संस्थेस स्वायत्त संस्था म्हणून दर्जा प्राप्त झाला आहे. देशाच्या ऊर्जा क्षेत्रात केंद्रीय विद्युत अनुसंधान संस्थान [Central Power Research Institute (CPRI)] ही संस्था राष्ट्रीय परीक्षण व प्रमाणीकरण प्राधिकरण (नॅशनल टेस्टींग अण्ड सर्टिफिकेशन ऑथॉरिटी) म्हणून कार्य करते. तसेच ऊर्जा क्षेत्रात उपलब्ध असलेली विद्युत उपकरणे आणि सयंत्रे यांच्या दर्जाबाबत व विद्युत दराबाबत प्रमाणीकरण करण्याचे कार्यही या संस्थेमार्फत करण्यात येते. सदर संस्थेने मौजे शिलापूर ता.जि.नाशिक येथील गट नंबर २२० मधील ४० हे.आर जमीन " केंद्रीय विद्युत अनुसंधान संस्थान" यांना पश्चिम विभागीय केन्द्रीय इलेक्ट्रिकल टेस्टींग लॅब स्थापन करण्यासाठी नाममात्र दराने भाडेतत्वावर अथवा विनामुल्य मंजूर करण्याची विनंती राज्यशासनाकडे केली होती.मौजे शिलापूर ता.जि.नाशिक येथे केंद्रीय विद्युत अनुसंधान संस्थान [Central Power Research Institute (CPRI)] या संस्थेची पश्चिम विभागीय केन्द्रीय इलेक्ट्रिकल टेस्टींग लॅब स्थापन झाल्यास राज्यात विद्युत उपकरण निर्मितीचा उद्योग भविष्यात या संस्थेमुळे भरभराटीस येऊ शकतो. केंद्रीय विद्युत अनुसंधान संस्थेमार्फत राज्यातील सर्व विद्युत उपकरण निर्मिती करणाऱ्या प्रकल्पांना राज्यातच सर्व प्रकारच्या विद्युत संचाचे परीक्षण करण्यासाठी संस्थेच्या प्रयोगशाळेचा उपयोग करणे शक्य होणार असल्याने ही संस्था महाराष्ट्र राज्यात असणे महाराष्ट्राच्या ऊर्जा क्षेत्रातील प्रगतीच्या दृष्टीने लाभदायक ठरणार आहे. याचा विचार

करता "केंद्रीय विद्युत अनुसंधान संस्थान " (CPRI) या संशोधन संस्थेची विद्युत अभियांत्रिकी क्षेत्रातील पश्चिम विभागीय केन्द्रीय इलेक्ट्रिकल टेस्टींग लॅब स्थापन करण्यासाठी सदर संस्थेने केलेल्या मागणीनुसार मौजे शिलापूर ता.जि.नाशिक येथील गट क्रमांक २२० मधील ८१ हे.३५ आर पैकी ४० हेक्टर ०० आर जमीन सदर संस्थेस ३० वर्षासाठी वार्षिक नाममात्र रूपये १/-या दराने भाडे आकारुन नियमित अटी व शर्तीवर भाडेपट्ट्याने मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. ह्या संदर्भात दिनांक ३०/९/२०१५ रोजी मंत्रिमंडळ बैठकीत विचार विनिमय होऊन झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय:-**

केंद्रीय विद्युत अनुसंधान संस्थान [Central Power Research Institute (CPRI)] या केंद्र शासनाच्या विद्युत मंत्रालयाच्या अधिपत्याखालील संशोधन संस्थेची विद्युत अभियांत्रिकी क्षेत्रातील पश्चिम विभागीय केन्द्रीय इलेक्ट्रिकल टेस्टींग लॅब ही नाशिक येथे स्थापन करण्यासाठी सदर संस्थेच्या मागणीनुसार मौजे शिलापूर ता.जि नाशिक येथील गट क्रमांक २२० मधील ८१ हे.३५ आर पैकी ४० हेक्टर ०० आर शासकीय जमीन महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ मधील कलम ३८ व कलम ४० अन्वये प्राप्त अधिकारांचा वापर करून वार्षिक नाममात्र रुपये १/-दराने भाडे आकारुन ३० वर्षाच्या भाडेपट्टयाने नियमित अटी व शर्तीवर तसेच खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून "केंद्रीय विद्युत अनुसंधान संस्थान" या केंद्र शासनाच्या स्वायत्त संस्थेस मंजूर करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

<u>**अटी व शर्ती**</u> :-

१) "केंद्रीय विद्युत अनुसंधान संस्थान" या केंद्र शासनाच्या स्वायत्त संस्थेस वार्षिक नाममात्र रुपये १/- या दराने भाडे आकारुन ३० वर्षासाठी भाडेपट्टयाने देण्यात येत असलेल्या सदर जमिनीचा, मंजूर प्रयोजनाव्यतिरिक्त अन्य कोणत्याही प्रयोजनासाठी शासनाच्या मंजुरीशिवाय वापर करता येणार नाही. मंजूर प्रयोजनाव्यतिरिक्त महसूल विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय या ही जमीनीची अथवा त्याच्या कोणत्याही भागाची विक्री, बक्षीसपत्र, गहाण व अन्य कोणत्याही प्रकारे वापर/हस्तांतरण करता येणार नाही. तसेच शासनाच्या महसूल विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय सदर जमीनीचे पोट विभाजन करता येणार नाही.

२) सदर भाडेपट्टा ज्या अटी व शर्तीवर मंजूर करण्यात येत आहे, त्याच अटी व शर्तीवर वेळोवेळी "केंद्रीय विद्युत अनुसंधान संस्थान" च्या विनंतीवरून नुतनीकरणास पात्र असेल. मात्र सदर जमिनीवर संस्थेस कुठलेही त्रयस्थ अधिकार निर्माण करता येणार नाहीत.

३) सदर जमिनीचा ताबा मिळाल्यापासून तीन वर्षाच्या आत बांधकामास सुरूवात करणे बंधनकारक राहील. अन्यथा नियोजित वापर सुरू होईपर्यंत शासनाच्या प्रचलित धोरणानुसार पुढील कार्यवाही करण्यात येईल.

४) विषयांकित जमिनीवर सक्षम प्राधिकरणाच्या परवानगीने व मंजूर विकास नियंत्रण व नियमावलीनुसार मंजूर प्रयोजनासाठी विकास करणे बंधनकारक राहील. तसेच या व्यतिरिक्त अन्य संबंधित विभाग / शासकीय यंत्रणा यांची मान्यता / पूर्वपरवानगी /नाहरकत आवश्यक तेथे घेणे बंधनकारक राहील.

५) शासकीय जमीन मंजूरी संदर्भातील इतर नियमित अटी या ठिकाणी लागू राहतील.

६) सदर जमीन मंजूर करण्याबाबतच्या अटी व शर्तींचा भंग झाल्यास जमीन शासनाकडे परत घेण्यात येईल, अशी अट भाडेपट्टा करारनाम्यात नमूद करण्यात यावी.

७) राज्यशासन किंवा राज्यशासनाचा उपक्रम असलेल्या विद्युत कंपन्यांची उपकरणे, संयंत्रे, संच इत्यादीची तपासणी करणे व इतर सर्व सेवा देणे तसेच अभियंत्याना प्रशिक्षण देणे याबाबतच्या दरांमध्ये २० टक्के कायमस्वरुपी सवलत केंद्रीय विद्युत अनुसंधान संस्थेने द्यावी.

८) जिल्हाधिकारी, नाशिक यांना योग्य वाटतील अशा अन्य अटी व शर्ती विहित करण्याची मुभा राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००६१७४९५३८११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Vitthal Veer

Digitally signed by Madhav Vitthal Veer
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3c0e93ab894790967228875f0b4fd8c2fda8590b77ae2ea700bf19e91a673afc, cn=Madhav Vitthal Veer
Date: 2015.10.09 13:54:36 +05'30'

**( डॉ. माधव वीर )**

शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई -३२.

७. अप्पर मुख्य सचिव (वित्त विभाग) मंत्रालय, मुंबई -३२.

८. प्रधान सचिव (महसूल) यांचे विकाअ/स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई -३२.

९. प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई -३२.

१०. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-१), मंत्रालय,मुंबई -३२

११. प्रधान सचिव, (उर्जा) उद्योग,उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई -३२

१२. सचिव, (मदत व पुनर्वसन) महसूल व वन विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई -३२

१३. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.

१४. जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे .

१५. जिल्हाधिकारी, नाशिक.

१६. मा. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य,(१) मुंबई -३२.

१७. मा. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य,(२) नागपूर

१८. महानिदेशक,केंद्रीय विद्युत अनुसंधान संस्थान,न्यु.बी.ई.एल.रोड, बेंगलुर ५६००८०

१९. नगर विकास विभाग (नवि-९), मंत्रालय,मुंबई -४०० ०३२

२०. वित्त विभाग (व्यय-९), मंत्रालय,मुंबई -४०० ०३२

२१. सर्व सह सचिव/ उप सचिव /अवर सचिव / क.अ., महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

२२. निवडनस्ती, कार्यासन ज-६, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई -३२.